सन २०१८-१९ करीता इको टुरिझम (राज्य) (२४०६ २२९५) योजनेंतर्गत बोर व्याघ्र प्रकल्प या निसर्ग पर्यटन स्थळाच्या विकास कामांकरिता निधी वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.निसप-२०१९/प्र.क्र.९/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १६ जानेवारी, २०१९**

वाचा :-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४२/१७८०/२०१८-१९, दि. ०८.०१.२०१९ रोजीचे पत्र.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर यांचे क्र. कक्ष-३(क)/योजना/प्र.क्र.५ (१८-१९)/९५५, दिनांक २७.१२.२०१८

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२/ यो/बोर व्या.प्र./८४४/१८-१९, दिनांक २८.११.२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्य योजनेअंतर्गत सन २०१८-१९ करीता निसर्ग पर्यटन/वन पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या लेखाशिर्षाखाली रू. ८४००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता महसूली शिर्षांतर्गत एप्रिल ते डिसेंबर या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी वितरीत करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

इको टुरिझम (राज्य) (२४०६ २२९५) योजनेअंतर्गत बोर व्याघ्र प्रकल्प या निसर्ग पर्यटन स्थळाचा आराखडा दिनांक ०७.११.२०१५ ला झालेल्या महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळाच्या तज्ञ समितीच्या सभेत सन २०१५-१६ ते २०१९-२० या पाच वर्षासाठी मंजूर झालेला असून, आराखडयाची एकूण किंमत रु.४९३.७५ लक्ष आहे. त्यापैकी सन २०१८-१९ साठी प्राप्त झालेल्या रु.६६.३६३ लक्षचा चालू बाब प्रस्ताव संदर्भ क्र.४ अन्वये व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांनी शिफारशीसह अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा.नागपूर यांचे कार्यालयास सादर केला होता. परंतू सदर प्रस्तावात त्रुटया आढळून आल्याने त्रुटयांची पूर्तता करुन संदर्भ क्र.३ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर यांचेकडून रु.६६.३६३ लक्ष पैकी फक्त रु.२४.२३ लक्षचा सुधारीत प्रस्ताव विवरण पत्रासह प्राप्त झालेला आहे.

सदर बोर व्याघ्र प्रकल्प या निसर्ग पर्यटन स्थळासाठी सन २०१८-१९ करीता रु.२४.२३ लक्ष रकमेच्या विवरणपत्रासह प्राप्त झालेल्या चालू बाब प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करुन BDS द्वारे अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता संदर्भ क्र.२ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ अन्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, बोर व्याघ्र प्रकल्प या निसर्ग पर्यटन स्थळाच्या विकास कामासाठी सन २०१८-१९ करीता रु.२४.२३ लक्ष इतका निधी राज्य योजनेअंतर्गत इको टुरिझम (राज्य) (२४०६ २२९५) या लेखाशिर्षा अंतर्गत खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
२. सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या सर्व कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्राप्त आहे याची खात्री अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), म.रा. नागपूर यांनी करुन घ्यावी.
३. वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशाची अवहेलना होणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर यांनी निसर्ग पर्यटन स्थळातील सदर कामांच्या अंदाजपत्रकांची आवश्यकतेनुसार पडताळणी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून करुन घ्यावी.
५. कार्यवाहीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दती अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.
६. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.
७. उपरोक्त कामे मंजूर अनुदानातून उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. सर्व कामे दर्जेदार होतील याबाबत योग्य शासन कार्यप्रणालीचा वापर केला जाईल व कोणतीही अनियमितता होणार नाही तसेच सर्व कामांच्या गुणवत्तेबाबत वेळोवेळी आवश्यकतेनुसार तपासणी करावी या सर्व बाबींची संबंधित निसर्ग पर्यटन स्थळांची जबाबदारी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर यांची राहील.

९. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१०.सदर मंजूर कामामध्ये द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही तसेच कामात कुठलीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

११.प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपूरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.

१२.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१३.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६ २२९५) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११६१५५१२२१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.16 16:03:07 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर

५. वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर

६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.

८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.

९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

१०. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)